**अंगणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस यांचे मानधन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२४/प्र.क्र.६०/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- २१ जून, २०२४

**संदर्भ:-** १) महिला व बाल विकास विभाग, शा. नि. क्र. एबावि-२०२२/प्र.क्र.२३५/का.६, दिनांक ०३.०४.२०२३,
२) महिला व बाल विकास विभाग, शा. नि. क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.६०/का.६, दिनांक ०८.०४.२०२४, दि. ०७.०५.२०२४ व दि. २७.०५.२०२४.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या अधिनस्त एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येते. केंद्र शासनाकडून विहीत कालावधीत निधी प्राप्त होत नसल्यामुळे अंगणवाडी सेविकांचे मानधन नियमित अदा करणे शक्य व्हावे, याकरिता अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २ जून, २०१७ रोजी आयोजित बैठकीत अंगणवाडी सेविकांच्या मानधनाची अर्थसंकल्पित केलेली रक्कम अपेक्षित केंद्रीय सहाय्य अप्राप्त असले तरी खर्च करण्यास विभागास अनुमती देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. सदर शासन निर्णयान्वये अंगणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस यांचे माहे जून, २०२४ या महिन्याचे मानधन अदा करण्याकरिता खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-१ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-२ मध्ये नमूद अर्थसंकल्पित तरतुदीमधून रकाना क्रमांक-४ मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रुपये १४९००.०० लाख एवढा निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष / संगणक सांकेतांक/उद्दिष्ट | अर्थसंकल्पिय तरतूद सन २०२४-२५ | वितरित निधी | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २२३६-पोषण आहार<br>०२-पोषक अन्न व पेये यांचे वितरण<br>१०१-विशेष पोषण आहार कार्यक्रम<br>(०८) (०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च)<br>केंद्र हिस्सा ६०% (२२३६ १९०९),<br>०२-मजूरी | ३०३००.०० | १२३३०.०० | ४११०.०० |
| (०८)(०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजना<br>राज्य हिस्सा ४०%<br>(२२३६ १९१८),<br>०२-मजूरी | २०२००.०० | ८२२०.०० | २७४०.०० |
| (०८) (०५) अंगणवाडी सेवा<br>अतिरिक्त राज्य हिस्सा १००%<br>(२२३६ १९४५)<br>०२-मजूरी | ६६५००.०० | २८९५०.०० | ८०५०.०० |
| **एकूण** | **११७०००.००** | **४९५००.००** | **१४९००.००** |

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी वरीलप्रमाणे उपलब्ध करून देण्यात आलेला निधी विहित पध्दतीने खर्च करण्याची कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२०/व्यय ६, दिनांक ३.५.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२११५२८५८२९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL DEORAO SARDAR

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=778B75C2C14BADBE6832D77601CF425AA7979B907650965C83919DBA7DC458C7, cn=SUNIL DEORAO SARDAR
Date: 2024.06.26 11:04:18 +05'30'

**(सुनिल सरदार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद),
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
७) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास,
८) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास ) (जिल्हा परिषद),
९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प,
१०) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई,
११) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई,
१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवड नस्ती -का-६.